**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील मान्यवर व्यक्तींचे स्मारक बांधणे तसेच अनुसूचित जातीसाठी सांस्कृतिक व ऐतिहासिक दृष्ट्या महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे व अनुसूचित जातीच्या सांस्कृतिक व नीतिमुल्यांवर आधारित विकास साधणाऱ्या प्रकल्पांसाठी स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करणे या योजनेअंतर्गत पंचशील बौध्दजन सेवा संघ, या संस्थेव्दारे गोरेगाव ता.माणगाव जि. रायगड या ठिकाणी डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मारक बहुउद्देशीय इमारत प्रकल्प उभारणे या कामासाठी निधी मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्वसेअ -२०२१/प्र.क्र.७७/बांधकामे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २९ ऑक्टोबर, २०२१.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.५.११.२०२०.

२) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र जा. क्र. सकआ/ मावक/ ऐति. स्थळ/ पंचशील/२०२१-२२/का-१२/७६५, दि.११.१०.२०२१.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील मान्यवर व्यक्तींचे स्मारक बांधणे तसेच अनुसूचित जातीसाठी सांस्कृतिक व ऐतिहासिक दृष्ट्या महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे व अनुसूचित जातीच्या सांस्कृतिक व नीतिमुल्यांवर आधारित विकास साधणाऱ्या प्रकल्पांसाठी स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करण्याविषयीचे निकष, मार्गदर्शक तत्वांना संदर्भ क्र. १, दि.५.११.२०२० अन्वये शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या विहित कार्यपध्दती नुसार योजनेअंतर्गत पंचशील बौध्दजन सेवा संघ, या संस्थेव्दारे गोरेगाव ता.माणगाव जि. रायगड या ठिकाणी डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मारक बहुउद्देशीय इमारत प्रकल्प उभारणे या कामासाठी रू.२,२२,६६,९२६/- (अक्षरी रूपये दोन कोटी बावीस लक्ष सहासष्ट हजार नऊशे सव्वीस फक्त) इतक्या रकमेचा प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर केला आहे.

सदर प्रस्तावास विभागाच्या दि.५.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय निवड समितीने दि.२६.१०.२०२१ रोजीच्या बैठकीत सदरील प्रस्तावास मान्यता प्रदान केली आहे. योजनेच्या निकषानुसार १०% रक्कम रू.२२,२६,६९२/- (अक्षरी रूपये बाविस लक्ष सव्वीस हजार सहाशे ब्यान्नव फक्त) संस्थेला स्वत: खर्च करावी लागणार आहे. त्यानुषंगाने सदरील प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पंचशील बौध्दजन सेवा संघ, या संस्थेव्दारे गोरेगाव ता.माणगाव जि. रायगड या ठिकाणी डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मारक बहुउद्देशीय इमारत प्रकल्प उभारणेबाबत रू.२,२२,६६,९२६/- (अक्षरी रूपये दोन कोटी बावीस लक्ष सहासष्ट हजार नऊशे सव्वीस फक्त) इतक्या रकमेचा प्रस्तावास योजनेच्या निकषानुसार खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. एकूण अंदाजपत्रकीय खर्चामध्ये शासनाचा हिस्सा ९० टक्के रू.२,००,४०,२३३/- ( अक्षरी रूपये दोन कोटी चाळीस हजार दोनशे तेहतीस फक्त) इतका हिस्सा शासनाचा राहील व बहुजन हिताय सामाजिक बांधिलकी, पुणे या संस्थेचा १० टक्के रू.२२,२६,६९२/- (अक्षरी रूपये बाविस लक्ष सव्वीस हजार सहाशे ब्यान्नव फक्त) इतका हिस्सा संस्थेचा राहील. विभागाच्या दि. ५.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील सर्व अटी व शर्तीची पूर्तता करावी.

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ रायगड यांचेकडून तपासणी करून साक्षांकन करून घ्यावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच कामास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.
३) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
४) प्रस्तावित बांधकामाची जागा सदर संस्थेच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.
५) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापूर्वी अंदाजपत्रकावर अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,कोकण, व विभागाच्या वतीने प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई यांनी साक्षांकन करावे.
६) सदर वास्तुचे हस्तांतरण इतर संस्थेला करता येणार नाही किंवा जागेची व वास्तुची खरेदी विक्री करता येणार नाही.
७) सदर वास्तुचा उपयोग व्यापारी म्हणून करता येणार नाही किंवा लग्न समारंभ इत्यादी बाबीसाठी करता येणार नाही.
८) शासनाच्या कार्यक्रमासाठी वा उपक्रमासाठी उपरोक्त वास्तुचा विनाशुल्क उपयोग करता येईल.

३. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयात नमूद मार्गदर्शक तत्वांचे पालन करुन पंचशील बौध्दजन सेवा संघ, या संस्थेव्दारे गोरेगाव ता.माणगाव जि. रायगड या ठिकाणी डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मारक बहुउद्देशीय इमारत प्रकल्प उभारणेबाबत या कामावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी सदर शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीची राहील. वर नमूद सर्व अटी पंचशील बौध्दजन सेवा संघ, या संस्थेव्दारे गोरेगाव ता.माणगाव जि. रायगड या संस्थेला मान्य असल्याबाबत करारपत्र करुन घ्यावे. शासनाच्या वतीने करारपत्रावर सही करण्यासाठी प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, रायगड

यांनी या ठिकाणी डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मारक बहुउद्देशीय इमारत प्रकल्प उभारणे या कामाचा सद्य:स्थितीचा त्रैमासिक अहवाल आणि वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना वेळोवेळी सादर करण्याची दक्षता घ्यावी.

४. सदर बांधकामावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (०५)(०२), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५ ३६३६), ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (योजनातर्गत-दत्तमत्त) या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या वर्षात मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर योजनेअंतर्गत विभागाच्या दि.५.१०.२०२१ रोजीच्या ज्ञापनान्वये, नियंत्रक अधिकारी म्हणून सहसचिव/उपसचिव (अर्थसंकल्प) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई यांना घोषित करण्यात येत आहे.तसेच आहरण व संवितरण अधिकारी, सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग,रायगड यांना घोषित करण्यात येत आहे. तसेच योजनेअंतर्गत मंजूर निधीचे वितरण हे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील नमूद अटीच्या अधीन काटेकोरपणे करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२११०२९१६२८४७४८२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, serialNumber=fd9b93035f4da174c04fa71634fe1f6aa493c78a5335f985651f937888df7a89, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2021.10.29 16:29:39 +05'30'

( अनिल कों.आहिरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
२) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,मुंबई.
४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड

५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड
६) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई
८) सहायक आयुक्त, समाजकल्याण, रायगड
९) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/रायगड
१०) अध्यक्ष/सचिव, पंचशील बौध्दजन सेवा संघ, गोरेगाव विभाग, मु.पो.गोरेगाव ता.माणगाव जि.रायगड.